**बांबू लागवड उपक्रमांतर्गत शासकीय, सार्वजनिक व सामुदायिक वन हक्क जमिनीवर करण्यात येणाऱ्या बांबू लागवडीची निगा राखण्याकरिता, संगोपन करण्याकरिता व सिंचनाची व्यवस्था करण्याकरिता विविध संस्थांसोबत करार करण्याची व्यवहार्यता तपासण्याकरीता अंमलबजावणी यंत्रणांशी संबंधित सरकारी विभागांच्या उपसचिवांचा समावेश असलेली समिती स्थापन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: रावकृ-२०२४/प्र.क.३४/ रावकृ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक : १४ ऑगस्ट, २०२४

**वाचा:** १. पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग शासन निर्णय क्रमांक: राकृक २०२३/ प्र. क्र. ९७/ तां. क.१, दि. १२ मार्च २०२४

२. पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग शासन निर्णय क्रमांक: राकृक २०२३/ प्र. क्र. ९७/ तां. क.१, दि. १८ एप्रिल २०२४

**प्रस्तावना:**

राज्यातील वातावरणीय बदलाच्या संकटाला तोंड देऊन शाश्वत विकास साधण्यासाठी गठित मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील -पर्यावरण व शाश्वत विकास टास्क फोर्स॰ अंतर्गत शाश्वत बांबू विकास कार्यक्रमावर देखरेख ठेवण्यासाठी गठित कार्यकारी समितीला आवश्यक बाबींवर तांत्रिक सल्ला देण्यासाठी संदर्भाधीन क्र. २. मधील शासन निर्णयान्वये मा. महासंचालक मनरेगा यांच्या अध्यक्षतेखाली देशातील व राज्यातील प्रमुख तज्ञ संस्थांच्या प्रतिनिधींचा समावेश असलेली एक तांत्रिक समिती गठीत करण्यात आली होती.

२. सदर तांत्रिक समितीच्या बैठका घेण्यात आल्या असून समितीच्या कार्यकक्षेनुसार विविध मुद्द्यांवर समितीने शिफारसी केल्या आहेत. तांत्रिक समितीला काही मुद्द्यांवर चर्चा करून अहवाल सादर करण्यास सांगण्यात आला होता, त्यापैकी तांत्रिक समितीने शिफारस केलेल्या मुद्द्यांवर चर्चा करून निर्णय घेण्यासाठी कार्यकारी समितीची दुसरी बैठक मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग व मा. महासंचालक, मनरेगा यांच्या संयुक्त अध्यक्षतेखाली दि. २४ मे २०२४ रोजी घेण्यात आली.

३. या बैठकीतील एक मुद्दा- वैयक्तिक जमिनीवरील बांबू लागवड वगळता शासकीय (जलसंपदा, जलसंधारण, गायरान, वन जमीन इ.), सार्वजनिक व सामुदायिक वन हक्क जमिनीवर केलेल्या बांबू लागवडीची निगा राखणे, संगोपन करणे, सिंचनाची व्यवस्था करणे व कुंपण बांधणे असा होता व त्याबाबत बैठकीमध्ये खालीलप्रमाणे चर्चा झाली.

- बांबू लागवड वैयक्तिक मालकीच्या शेतजमिनीसोबतच सार्वजनिक व शासकीय पड जमीन, गायरान, वन जमीन, सामुदायिक वन हक्क जमीन, नदी नाल्यांलगत, तलाव व धरणांच्या लगत तसेच रस्त्यांकडेला देखील करावयाची आहे. याशिवाय भारत सरकारने एकूण खाजगी जमिनीपैकी २०% जमिनीवर वनीकरण करण्याचे लक्ष सुनिशचित केले आहे.
- महाराष्ट्र शासन शेतकरी उत्पादक संस्था (FPOs), अशासकीय संस्था (NGOs) इत्यादी संस्थांसोबत बांबू लागवडीची निगा राखण्याकरिता, संगोपन करण्याकरिता, व सिंचनाची व्यवस्था करण्याकरिता करार करू शकेल असे तांत्रिक समितीने सूचित केले.

- तांत्रिक समितीने निर्दिष्ट केलेल्या मानकांच्या आधारे बांबू लागवडीचे व्यवस्थापन करण्यासाठी शेतकरी उत्पादक संस्था (FPOs), अशासकीय संस्था (NGOs), विश्वस्त संस्था, सहकारी संस्था, कंपन्या इत्यादी संस्थांसोबत संबंधित सरकारी विभागाने व्यवस्थापन करार करणेबाबतची व्यवहार्यता तपासून निर्णय घेणेसाठी महासंचालक, मनरेगा यांच्या अध्यक्षतेखाली, सर्व संबंधित सरकारी विभागांच्या उपसचिवांचा समावेश असलेली एक समिती स्थापन करण्यात यावी असा निर्णय कार्यकारी समितीने घेतला.

## शासन निर्णय

कार्यकारी समितीच्या निर्णयानुसार शासकीय, सार्वजनिक व सामुदायिक वन हक्क जमिनीवर करण्यात येणाऱ्या बांबू लागवडीची निगा राखण्याकरिता, संगोपन करण्याकरिता व सिंचनाची व्यवस्था करण्याकरिता विविध संस्थांसोबत करार करण्याची व्यवहार्यता तपासण्याकरीता मा. महासंचालक, मनरेगा यांच्या अध्यक्षतेखाली अंमलबजावणी यंत्रणांशी संबंधित सरकारी विभागांच्या उपसचिवांचा समावेश असलेली समिती स्थापन करण्यात येत आहे. या समितीद्वारे विभागांमध्ये माहिती आणि ज्ञानाची देवाणघेवाण होईल व बांबू लागवड उपक्रमाची जलद अंमलबजावणी सुलभ होईल.

या समितीची रचना खालीलप्रमाणे असेल:

| **क्र.** | **पद नाम** | **विभाग** | **समितीतील पद** |
|---|---|---|---|
| १. | महासंचालक | मनरेगा, रोहयो | अध्यक्ष |
| २. | उपसचिव | कृषि विभाग | सदस्य |
| ३. | उपसचिव | वन विभाग | सदस्य |
| ४. | उपसचिव | ग्रामविकास विभाग | सदस्य |
| ५. | उपसचिव | महसूल विभाग | सदस्य |
| ६. | उपसचिव | जलसंधारण विभाग | सदस्य |
| ७. | उपसचिव | जलसंपदा विभाग | सदस्य |
| ८. | उपसचिव | सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ९. | उपसचिव | आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| १०. | राज्य गुणवत्ता नियंत्रक | मनरेगा, रोहयो | सदस्य सचिव |

## कार्यकक्षा:

- शासकीय, सार्वजनिक व सामुदायिक वन हक्क जमिनीवर करण्यात येणाऱ्या बांबू लागवडीची निगा राखण्याकरिता, संगोपन करण्याकरिता व सिंचनाची व्यवस्था करण्याकरिता महाराष्ट्र शासन शेतकरी उत्पादक संस्था (FPO), अशासकीय संस्था (NGOs), विश्वस्त संस्था, सहकारी संस्था, कंपन्या इत्यादी संस्थांसोबत करार करण्याची व्यवहार्यता तपासून निर्णय घेणे.
- संस्थेस मिळणाऱ्या उत्पन्नातील भागीदारी निश्चित करणे.
- बांबू लागवडीसाठी विविध लक्ष्ये/पद्धती/मानकांच्या अंमलबजावणीची व्यवहार्यता तपासणे.
- वरील मुद्द्यांबाबत अहवालाद्वारे कार्यकारी समितीस अभिप्राय कळविणे.
- कार्यकारी समितीच्या निर्देशानुसार इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

## बैठकांचा कालावधी

मा. महासंचालक, मनरेगा तथा अध्यक्ष यांच्या निर्देशानुसार.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०८१४१२४१३२७९०४ आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT
KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.08.14 12:57:03 +05'30'

**(सु. कि. निकम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महादेय यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, (गृह व ऊर्जा), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. मंत्री, महसूल, मंत्रालय, मुंबई.
८. मा. मंत्री, वने, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री, ग्रामविकास, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
११. मा. मंत्री, कृषी, मंत्रालय, मुंबई.
१२. मा. मंत्री, जलसंधारण, मंत्रालय, मुंबई.
१३. मा. मंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
१४. मा. मंत्री, रोहयो, मंत्रालय, मुंबई.
१५. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई.
१६. मा. मंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१७. मा. राज्यमंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई.
१८. मा. राज्यमंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१९. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२०. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२१. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२२. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२४. मा. अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. मा. अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६. मा. अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. मा. अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८. मा. अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९. मा. अ.मु.स. /प्रधान सचिव/ सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
३०. मा. अ.मु.स. /प्रधान सचिव/ सचिव, जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१. मा. अ.मु.स. /प्रधान सचिव/ सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३२. मा. अ.मु.स. /प्रधान सचिव/ सचिव (रोहयो),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३३. मा. अ.मु.स. /प्रधान सचिव/ सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३४. मा. अ.मु.स. /प्रधान सचिव/ सचिव (सर्व विभाग), मंत्रालय, मुंबई.
३५. मा. महासंचालक, मनरेगा, मंत्रालय, मुंबई.
३६. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
३७. मा. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
३८. निवडनस्ती.